# शिवकालीन हिजरी आणि सुहूर कालगणना

---

१७ व्या आणि १८ व्या शतकातील विविध प्रकारच्या कागद पत्रामध्ये हिजरी आणि सुहूर कालगणानेचा वापर केलेला दिसतो. शिवकालीन पत्रे वाचताना ही कालगणना समझून घेणे गरजेचे असते.

महत्वाचे हिजरी सन हा चांद्र वर्षावर आधारित आहे तर सुहूर सन सौर वर्षावर आधारित असतो.

**एका वर्षातील दिवस** -

हिजरी सनाचे वर्ष ३५४ किंवा ३५५ दिवसांचे असते. तर सुहूर सन ३६५ किंवा ३६६ दिवसांचे. त्यामुळे हिजरी वर्ष  दरवर्षी १० ते १२ दिवस सुहूर पेक्षा लवकर संपते. हिजरी सन इसवी सन ६२२ ला सुरुवात झाली. तर सुहूर सन निश्चित कधी सुरू झाला हे माहीत नाही पण साधारण इसवी सन १३४३-४४ मध्ये सुरू करण्यात आला असे अनुमान निघते. म्हणजे हिजरी ७४४ ला सुहूर सन आणि हिजरी सन हा सारखाच होता.

इसवी सनाचा विचार केल्यास सुहूर सन दरवर्षी जुन्या इसवी २४ मे पासून सुरू होऊन २३ मे ला पूर्ण होते. त्यामुळे इसवीसन व सुहूर यामधील फरक हा नेहमी सारखाच म्हणजे ५९९ किवा ६०० इतका असतो.

**वर्षातील महीने** -

हिजरी मध्ये १२ महीने येतात.

1. मुहरम
2. सफ़र
3. रबी अल-अव्वल / रबिलावल

4. रबी अल-आखर / रबिलाखल
5. जमाद अल-अव्वल / जमादिलावल
6. जमाद अल- आखर / जमादिखर
7. रज्जब
8. शआबान / साबान
9. रमज़ान
10. शव्वाल / सवाल
11. ज़ु अल-क़ादा / जिल्काद
12. ज़ु अल-हज्जा / जिल्हेद

म्हणजे हिजरी सन १ मुहरम ला सुरुवात होऊन ३० जिल्हेद ल संपते. पण इसवी सन महिन्याची तारीख १० ते १२ दिवसांच्या फरकामुळे दरवर्षी कधीच सारखी येत नाही ती तक्त्या प्रमाणे काढावी लागते. (खरे जंत्री पहावी ) उदा. सुहूर १०४२ हे वर्ष १४ जिल्हाद हिजरी सन १०४१ म्हणजेच २४ मे १६३२ ला सुरू झाले. त्यानंतर त्याच हिजरी वर्षातील १३ जिल्हाद ही तारीख १२ मे रोजी येते. पण त्यावेळी सुहूर सन संपत नाही ते ११ दिवस पुढे २३ मे १६३३ ला जाऊन संपते. तर हिजरी सन १०४२ हे ९ जुलै ला आले. पण पुढील हिजरी सन ११ दिवस अगोदरच २७ जून ल संपले. उदा. चित्र क्र. १



महत्वाचे - प्रत्येक सुहूर सना मध्ये हिजरी महिन्याच्या १२ मे ते २३ मे मधील तारखा ह्या त्यावर्षात सुरूवातीला देखील येतात. म्हणजे एकाच तारखेचे २ इसवी सनाच्या तारखा असू शकतात. त्यासाठी तारखे पुढे अवल साल किवा अखेर साल लिहिलेले आढळते.

वरील उदाहरणात १४ जिल्काद ते २४ जिल्काद या हिजरी महिन्याच्या तारखा सुहूर सन १०४२ मध्ये दोन वेळा आल्या.

**पत्रातील लेखन पद्धती** -

सुहूर सन कधीही आकड्यात लिहीत नाहीत ,अक्षरांमध्येच लिहिला गेला आहे. संख्या लिहिण्यासाठी अरबी संख्यावाचक शब्द वापरतात. सुहूर सनाची संख्या अक्षरांमध्ये लिहिताना पहिले एकं नंतर दहम, शेकडा आणि मग सहस्त्र असा क्रम असतो. सुहूर सन अक्षरामध्ये लिहिण्याच्या आधी मोडी मध्येच सु ॥ असे लिहिले जाते. हा अक्षरी सन पत्राच्या पहिल्या २ऱ्या किंवा ३ ओळीमध्येच येतो.

हिजरी सन आदिलशाही कागद्पत्रामध्ये असतोच असतो. पण मुगल कागद्पत्रामध्ये असेलेच असे नाही. हिजरी कालगणंनेतील महिन्याच्या तारखा लिहिताना तारखेच्या आकड्या पूर्वी छ असे लिहिले जाते.

छ हे चंद्र या शब्दाचा संक्षेप आहे. ही तारीख पत्राच्या शेवटच्या ओळींमध्येच येते.

**सुहूर सन चे उदाहरण** चित्र क्र. २



**छ चे उदाहरण** चित्र क्र. ३




उदा. सुहूर सन ११५८ हे लिहिताना समान खमसेन मया व अलफ असे लिहिले जाईल.

इसवी सन १७०० च्या आधी येणाऱ्या शिवकलातील वर्षांमध्ये तीनच संख्यावाचक शब्द येतात. त्यात मया येत नाही. पण १८ व्या शतकातील सर्व पत्रांमध्ये मया व अलफ असे जोडून येतेच येते.१९व्या शतकात म्हणजेच १८०० च्या पुढील कागदप्रत्रात मयातैन व अलफ असे लिहिले जाते. पुढील कोष्टक पहावे. चित्र क्र. ४

| कालखंड | संख्या |
|---|---|
| १६०० (२४ मे नंतर )–१७०० (२३ मे पर्यन्त) | दोन अंकी संख्यावाचक अरबी शब्द + अलफ |
| १७०० (२४ मे नंतर )-१८०० (२३ मे पर्यन्त) | दोन अंकी संख्यावाचक अरबी शब्द + मया व अलफ |

## सुहूर सनातील अंकांचे अरबी शब्दातील कोष्टक -

| हजार | शंभर ते नऊशे | वीस ते नव्वद | एक ते दहा |
|---|---|---|---|
| अलफ = १००० | मया = १०० | इसरीन/ अशरीन = २० | अहद/इहिदे = १ |
| | मयातैन = २०० | सलासीन = ३० | इसने = २ |
| | सलासमया = ३०० | आर्बेन = ४० | सलास = ३ |
| | अर्बामया = ४०० | खमसैन = ५० | अर्बा = ४ |
| | खमसमया - ५०० | सितैन = ६० | खमस = ५ |
| | सीतमया - ६०० | सबैन = ७० | सित = ६ |
| | सिमतया - ७०० | समानीन = ८० | सबा = ७ |
| | समानमया - ८०० | तिसैन = ९० | समान = ८ |
| | तिसामया - ९०० | | तिसा = ९ |
| | | | अशर = १० |

- मांडणी आणि संकलन - हरेश तुपे